**अग्निशमन आपत्कालिन सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान योजनेंतर्गत निधी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-अशसे-२०१८/प्र.क्र.९१/नवि-०४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- २ जानेवारी, २०१९**

**वाचा:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.अशास-४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२०, दि.३१.०८.२००९.

२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.अशासे-२०१६/प्र.क्र.४७७/नवि-२०,दि.१० मार्च,२०१७.

३)नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.अशासं-२०१७/प्र.क्र.७८/नवि-२०,दि.२२ मार्च,२०१७.

४) महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.मअसे/२०१७/१८-आय/२४३,दि.१७ फेबुवारी,२०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका/नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरून काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र अग्निसुरक्षा अग्निसुरक्षा अभियान राबविण्याचा निर्णय वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये शासनाने घेतला आहे. सदर अभियानाअंतर्गत वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ या वर्षासाठी कन्हान-पिंपरी (जि.नागपूर) नगरपरिषदेला रु.६४.०० लक्ष व वाचा क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ या वर्षासाठी मोहपा (जि.नागपूर) नगरपरिषद,बारामती (जि.पुणे) नगरपरिषद व कामठी (जि.नागपूर) नगरपरिषदेला एकुण रु.६६.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आलेल होते.सदर निधीच्या खर्चाचे देयक काढण्यासाठी संचालक,महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी व तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात आलेले होते.सदर निधीचे देयके अधिदान व लेखा कार्यालयाने मंजुर करुन सदर रकमांचे रिझर्व्ह बँक ऑफ इंडीया,मुंबई या बँकेचे धनादेश महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय कार्यालयास प्राप्त झाले होते. सदर धनादेश महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय कार्यालयाने कार्पोरेशन बँक,सांताक्रुझ (पुर्व) या शाखेत जमा केले होते.परंतु, कार्पोरेशन बँक,सांताक्रुझ (पुर्व) या शाखेने त्यांच्या १० जुलै,२०१७ च्या पत्रान्वये सदर धनादेश Invalid Sort Code असा शेरा देऊन परत केले. अधिदान व लेखा कार्यालयाने त्यांच्या दिनांक २१/८/२०१७ च्या पत्रान्वये सदर मुदतबाह्य धनादेशांची धनादेश नोंदवहीची पडताळणी करुन ते रद्दबाद करण्यात आल्याचे कळविले आहे.सबब,सदर निधी संबधीत नगरपरिषदांना प्राप्त झालेला नाही.सदर निधी सन २०१८-१९ या वर्षासाठी अर्थसंकल्पीत निधीतुन संबधीत नगरपरिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत **कन्हान-पिंपरी** (जि.नागपूर), **मोहपा** नगरपरिषद (जि.नागपूर),**बारामती** नगरपरिषद (जि.पुणे) व **कामठी** नगरपरिषद (जि.नागपूर) यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ क्र.६ मध्ये दर्शविल्याप्रमाणे **रु. १.३० कोटी** इतका निधी मंजुर करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**२.** सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी तसेच संबंधित सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरीत करुन संबधीत मुख्याधिकारी यांना वितरित करुन अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

**३.**सदर अनुदान वाचा क्र.(१),(२) व (३) येथील शासन निर्णयातील इतर अटी व शर्तीच्या अधीन राहुन वितरीत करण्यात येत आहे.

**४.** सदर कामासाठी येणारा खर्च "एफ-२, २२१७, नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००)(५३) राज्यातील नगरपरिषदांना अग्निशमन सेवा व आणीबाणीच्या सेवांच्या बळकटीकरणासाठी सहाय (२२१७ ३२१५) ३१, सहाय्यक अनुदान (वेनतेतर)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करून देण्यात आलेल्या सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानमधून भागविण्यात यावा.

**५.** सदर शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार विनियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ मधील तसेच परिशिष्टातील अ.क्र.८ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१९०१०२१२१३२१८५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sharad Kirwale
Digitally signed by Sharad Kirwale
DN: CN = Sharad Kirwale, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2019.01.02 13:40:29 +05'30'

**( शरद किरवले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१)मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद संचालनालय,वरळी,मुंबई.
११) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१२) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१३) अग्निशमन सल्लागार, महाराष्ट्र शासन, सांताक्रुझ (पुर्व), मुंबई
१४) संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रुझ (पुर्व), मुंबई.
१५) मुख्याधिकारी, कन्हान-पिंपरी नगरपरिषद (जि.नागपूर)/मोहपा नगरपरिषद (जि.नागपूर)/बारामती नगरपरिषद (जि.पुणे) /कामठी नगरपरिषद (जि.नागपूर)
१६) कक्ष अधिकारी (व्यय-३) / (अथसंकल्प-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) कक्ष अधिकारी (नवि-२९)/(नवि-३१), नगर विकास, विभाग,मंत्रालय, मुंबई
१८) निवडनस्ती, (नवि-०४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र. असशो-२०१८/प्र.क्र.९१/नवि-०४,दिनांक २ जानेवारी,२०१९ चे सहपत्र.**

(रुपये लाखात)

| अ.क्र. | नगरपरिषद | शासनाचा हिस्सा | यापुर्वी वितरीत करण्यात आलेला निधी | शासन निर्णय दिनांक | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मोहपा नगरपरिषद (जि.नागपूर) | ६४.०० | ४०.०० | १२/०५/२०१४ | २४.०० |
| २ | बारामती नगरपरिषद (जि.पुणे) | ७३.५० | ५२.५० | १२/०५/२०१४ | २१.०० |
| ३ | कामठी नगरपरिषद (जि.नागपूर) | ७३.५० | ५२.५० | १२/०५/२०१४ | २१.०० |
| ४ | कन्हान-पिंपरी नगरपरिषद (जि.नागपूर) | ६४.०० | ००.०० | -- | ६४.०० |
| **एकुण अक्षरी रुपये एक कोटी तीस लाख मात्र** | | | | | **१३०.००** |

Sharad Kirwale
Digitally signed by Sharad Kirwale
DN: CN = Sharad Kirwale, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2019.01.02 13:40:54 +05'30'

**(शरद किरवले)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

***********